"राज्यात जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शनाच्या आयोजनाकरीता जाहिरात व प्रसिध्दी योजने अंतर्गत सन २०१८-१९ साठी रु. २५.०० लाख इतके अर्थसहाय्य संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांना उपलब्ध करुन देण्याबाबत"

## महाराष्ट्र शासन

### सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग

### शासन निर्णय क्रमांकः हातमाग-२०१८/२४६/प्र.क्र.१०९/टेक्स-३

नवीन प्रशासन भवन, १४ वा मजला
मादाम कामा रोड, हुतात्मा राजगुरू चौक,
मंत्रालयासमोर, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २९ जानेवारी, २०१९

**वाचा :**

१) शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८

२) शासन पत्र, वित्त विभाग क्र. शासाउ १०.१८/प्र.क्र.४८/सा.उ., दिनांक २० एप्रिल, २०१८

३) संचालक वस्त्रोद्योग, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांचे पत्र क्र. कार्या-२(३)/क-२०/ ३२८६/ २०१८, दिनांक ३० मे, २०१८

४) शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. हातमाग-२०१८/२४६/प्र.क्र.१०९/ टेक्स-३, दिनांक २८ जानेवारी, २०१९

**प्रस्तावना :-**

केंद्र पुरस्कृत राष्ट्रीय हातमाग विकास कार्यक्रम (National Handloom Development Programme) योजनेअंतर्गत सन २०१५-१६ पर्यंत राष्ट्रीय व राज्यस्तरीय प्रदर्शनासह जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शनेही आयोजित करण्यात आलेली आहेत. तथापि सन २०१६-१७ पासून केंद्र शासनाने जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शनाच्या आयोजनासाठी मंजूरी प्रदान केली नसल्याने मागील दोन वर्षापासून राज्यात जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शने आयोजित करता आली नाहीत. त्यामुळे हातमाग विणकरांची हलाखीची परिस्थिती लक्षात घेऊन त्यांच्या हाताला काम मिळावे व त्यांनी उत्पादित केलेल्या वाणाला प्रसिध्दी मिळावी तसेच त्यांच्या मालाची विक्री होऊन त्यांच्या उदरनिर्वाहास हातभार लागावा या उद्देशाने संचालक वस्त्रोद्योग, नागपूर यांच्या संदर्भाधीन क्र. ३) येथील दिनांक ३० मे, २०१८ च्या पत्रान्वये प्राप्त प्रस्तावानुसार सन २०१८-१९ ते २०२२-२३ या कालावधीसाठी प्रत्येक वर्षासाठी पाच जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शने आयोजित करण्यासाठी प्रति प्रदर्शन रु. ५.०० लाख याप्रमाणे प्रत्येक वर्षी रु. २५.०० लाख इतका निधी संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना उपलब्ध करुन देण्याबाबतच्या योजनेस संदर्भ क्र. ४) येथील दिनांक २८ जानेवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. सदर योजनेंतर्गत सन २०१८-१९ साठी रु. २५.०० लाख इतके अर्थसहाय्य संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांना उपलब्ध करुन देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर यांना सन २०१८-१९ साठी पाच जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शने आयोजित करण्यासाठी प्रति प्रदर्शन रु. ५.०० लाख याप्रमाणे रु. २५.०० लाख (रु. पंचवीस लाख फक्त) इतका निधी मंजूर करुन वितरीत करण्यास सदर शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. शासन परिपत्रक, वित्त विभाग क्र. अर्थसं-२०१८/प्र.क्र.६९/अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये सन २०१८-२०१९ च्या प्रथम नऊमाहीसाठी (डिसेंबर, २०१८ अखेर) आवश्यक असणारा अनिवार्य व कार्यक्रमांतर्गत खर्चाचा अर्थसंकल्पित निधी एकूण वार्षिक तरतुदीच्या ७० टक्केच्या मर्यादेत खर्च करण्यास परवानगी देण्यात आली आहे. सन २०१८-१९ या वर्षात "मागणी क्र. व्ही-२" अंतर्गत '२८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग खालील ११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना अर्थसहाय्य, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२८५१ ०११९), २६, जाहिरात व प्रसिध्दी' या लेखाशीर्षाखाली रु. १५०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी ७०% म्हणजे रु. १०५.०० लाख इतका निधी डिसेंबर, २०१८ पर्यंत खर्च करण्यास उपलब्ध असून रु. ८०.०० लाख इतका निधी खर्च झाला असून रु. २५.०० लाख इतका निधी अखर्चित आहे.

३. वित्त विभागाच्या दि. २ एप्रिल, २०१८ च्या परिपत्रकामधील परिच्छेद क्र. ६ (अ) नुसार राज्यात जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शनाच्या आयोजनाकरीता जाहिरात व प्रसिध्दी योजने अंतर्गत सन २०१८-१९ ते २०२२-२३ या कालावधीसाठी संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांना दरवर्षी रु. २५.०० लाख इतके अर्थसहाय्य उपलब्ध करुन देण्याबाबतच्या योजनेस दिनांक २८ जानेवारी, २०१९ च्या शासन निर्णयान्वये प्रशासकीय मान्यता देण्यात आली आहे. तसेच ६ (ब) नुसार उपरोक्त लेखाशीर्षाखाली सन २०१८-१९ करीता रु. १५०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित करण्यात आला आहे.

४. वित्त विभागाच्या उपरोक्त परिपत्रकासोबतच्या परिशिष्टातील अ.क्र. २ बाबत नमूद करण्यात येते की, योजनेच्या स्वरुपात अथवा व्याप्तीमध्ये बदल होत नसल्याने नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीची आवश्यकता नाही. तसेच परिशिष्टातील अ.क्र. ८ मधील तपासणी सूचीतील मुद्दयांचीही पूर्तता होत आहे. परिच्छेद क्र. ७ मधील तरतुदी या प्रकरणी लागू नाहीत.

५. परिच्छेद क्र. ६ क) मध्ये नमूद केल्यानुसार, तसचे सदर परिपत्रकातील परिच्छेद क्र. ६ ब), ८ व १० मधील अटी या प्रकरणी लागू असून त्या अटींची पूर्तता सदर प्रकरणी होत आहे.

६. शासन परिपत्रक, वित्त विभाग, क्र. संकीर्ण- २०१६/ प्र.क्र.३१/ कोषा.प्रशा-५, दिनांक १० मे, २०१६ मध्ये कोषागारात देयके पारित करताना घ्यावयाच्या दक्षतेबाबत सूचना देण्यात आल्या आहेत. सदर परिपत्रकातील परिच्छेद- अ) मधील बाबींची प्रस्तुत प्रकरणाशी संबंधित माहिती खालीलप्रमाणे आहे -

१) **विभागास प्रदान वित्तीय अधिकार** :- विभागाच्या शासन निर्णय, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग क्र. हातमाग-२०१८/२४६/प्र.क्र.१०९/टेक्स-३, दिनांक २८ जानेवारी, २०१९ अनुसार "२६, जाहिरात व प्रसिद्धी" या बाबीखालील खर्च करण्यास विभागास अधिकार प्राप्त झाले आहेत.

२) **मंजूर निधी** :- “मागणी क्र. व्ही-२” अंतर्गत ‘२८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग खालील ११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना अर्थसहाय्य, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२८५१ ०११९), २६, जाहिरात व प्रसिध्दी’ या लेखाशीर्षाखाली रु. १५०.०० लाख इतका निधी अर्थसंकल्पित असून त्यापैकी रु. ८०.०० लाख इतका निधी खर्च झाला असून रु. २५.०० लाख इतका निधी अखर्चित आहे.

३) **मागील ३ महिन्यांपूर्वी दिलेल्या अनुदानापैकी ७५% किंवा अधिक निधी खर्च झाला आहे** :- संचालक वस्त्रोद्योग, नागपूर यांना सन २०१८-१९ या आर्थिक वर्षात यापूर्वी या प्रयोजनासाठी निधी वितरीत करण्यात आलेला नाही.

४) **ज्या लेखाशीर्षाखाली अनुदान वितरित करण्यात येत आहे, त्या लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही** :- उपरोक्त लेखाशीर्षांतर्गत एक वर्षापूर्वीचे संक्षिप्त देयक प्रलंबित नाही.

५) **स्थानिक स्वराज्य संस्थांना अनुदान देताना त्यांचेकडून राज्य शासनास येणे नाही किंवा येणे रक्कम समायोजित करण्यात आली आहे** :- लागू नाही.

६) **वैयक्तिक लाभार्थींचे देयक सादर करताना यादीसह व शक्यतो आधार क्रमांकासह सादर करावे** :- लागू नाही.

७) **बांधकामविषयक प्रस्तावांना प्रशासकीय मान्यता देताना सक्षम अधिका-याची मान्यता घेतल्याचा उल्लेख आदेशात असावा** :- लागू नाही.

८) **खरेदी विषयक अद्ययावत प्रक्रिया उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग III / उद्योग-४, दि. १.१२.२०१६ च्या शासन आदेशानुसार करावी व तसा उल्लेख प्रशासकीय मान्यतेत असावा** :- याचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

९) **साहित्य खरेदीची रक्कम पुरवठादाराच्या नावे ECS द्वारे आहरित करावी**:- याचा उल्लेख शासन निर्णयात करण्यात आला आहे.

७. हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य, जाहिरात व प्रसिध्दी या योजनेंतर्गत राज्यात जिल्हास्तरीय हातमाग कापड प्रदर्शनाच्या आयोजनाकरीता या शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेला रु. २५.०० लाख (रु. पंचवीस लाख फक्त) इतका निधी जिल्हा कोषागार, नागपूर येथून काढण्यासाठी संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांचे कार्यालयातील सहाय्यक संचालक (लेखा) यांना “आहरण व संवितरण अधिकारी” व संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, नागपूर यांना “नियंत्रक अधिकारी” म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्क्म ज्या प्रयोजनासाठी उपलब्ध करुन देण्यात येत आहे त्याच प्रयोजनासाठी खर्च करण्यात यावी.

८. सदर निधी आवश्यकतेनुसार महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर व महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स), मुंबई यांना थेट ECS द्वारे अदा करण्यात यावा.

९. शासकीय विभागाने करावयाच्या कार्यालयीन खरेदीसाठीच्या कार्यपद्धतीची सुधारीत नियमपुस्तिका उद्योग, ऊर्जा व कामगार विभागाच्या क्र. भांखस-२०१४/ प्र.क्र.८२/ भाग III / उद्योग-४, दि. १.१२.२०१६ च्या शासन निर्णयान्वये प्रसिद्ध केली आहे. सदर शासन निर्णयाच्या तसेच त्यासोबतच्या नियमपुस्तिकेतील तरतुदींचे काटेकोरपणे पालन करण्यात यावे.

१०. जाहिरातीवरील खर्च करताना त्यासंबंधीचे वित्तीय अधिकार नियम पुस्तिकेत नमूद वित्तीय अधिकारांचे पालन करण्यात यावे. तसेच जाहिराती संदर्भात शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग क्र. मावज-२०१५/प्र.क्र.३२७/३४, दिनांक ६ ऑक्टोबर, २०१५ मध्ये तसेच या संदर्भातील सामान्य प्रशासन विभागाच्या दिनांक ३० मार्च, २०१६ व दिनांक ५ जानेवारी, २०१७ च्या शासन निर्णयात नमूद सूचनांनुसार तथा विहीत नियमानुसार कार्यवाही करण्याची दक्षता घ्यावी तथा त्यांचे तंतोतंत पालन करण्यात यावे.

११. प्रमाणित करण्यात येते की, जाहिरात व प्रसिद्धी योजेंतर्गत यापूर्वी वितरीत केलेल्या निधीच्या अनुषंगाने लेखापरीक्षक/महालेखापाल यांच्याकडून कोणतेही गंभीर आक्षेप नाहीत.

१२. ह्या निधीतून खरेदी करण्यात येणाऱ्या साहित्याची देयके प्रत्यक्ष वस्तू प्राप्त झाल्यानंतरच संबंधितांना (ECS द्वारे) अदा होतील याची दक्षता घ्यावी.

१३. प्रमाणित करण्यात येते की, सदर निधी स्वीय प्रपंची लेखा अथवा बँक खात्यात जमा न करता खर्च केला जाणार आहे.

१४. उपरोक्त प्रयोजनासाठी होणारा खर्च "मागणी क्र. व्ही-२" अंतर्गत '२८५१, ग्रामोद्योग व लघुउद्योग खालील ११०,संमिश्र ग्रामोद्योग व लघुउद्योग आणि सहकारी संस्था, (०२) विविध सहकारी संस्थांना अर्थसहाय्य, (०२)(५०) हातमाग उद्योगाच्या विकासाकरीता सूट व इतर अर्थसहाय्य (राज्य हिस्सा २५ टक्के) (कार्यक्रम) (२८५१ ०११९), २६, जाहिरात व प्रसिध्दी' या लेखाशीर्षाखाली खर्ची टाकावा व सन २०१८-२०१९ या आर्थिक वर्षासाठीच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

१५. महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर व महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स), मुंबई यांनी उपरोक्त रकमेचे विनियोग प्रमाणपत्र संचालक वस्त्रोद्योग, नागपूर यांच्यामार्फत शासनास सादर करावे.

१६. वरील रकमेचा खर्च विहीत पद्धतीने करण्यात यावा.

१७. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं- २०१८/ प्र.क्र.६९/ अर्थ-३, दिनांक २ एप्रिल, २०१८ अन्वये "२६, जाहिरात आणि प्रसिध्दी" या प्रयोजनासाठी प्रशासकीय विभागास प्रदान करण्यात आलेल्या प्राधिकारानुसार तसेच महामंडळाला निधीवाटप करण्यासाठी वित्त विभागाच्या सार्वजनिक उपक्रम व व्यय-२ कार्यासनाच्या अनौपचारिक संदर्भ क्र. ६४६/ २०१८/ व्यय-२, दिनांक २४/१२/२०१८ नुसार प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

१८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१९०१२९१५५४३०२४०२ असा आहे. हा शासन निर्णय डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावांने,

PRAMOD DATTATRAYA TUPE

Digitally signed by PRAMOD DATTATRAYA TUPE
DN: c=IN, st=Maharashtra, 2.5.4.20=25fb9d155cb4ae55ebc591d80f2e588a505237544f7c760ae3f32ae952f91058, postalCode=400032, street=MANTRALAYA,MUMBAI, serialNumber=750e3d339fabe697f13347901277e881075dd78c20a924b9acb3b93db44f2d61, ou=CO OPERATION MARKETING AND TEXTILE DEPT, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, cn=PRAMOD DATTATRAYA TUPE
Date: 2019.01.29 16:05:10 +05'30'

**(प्रमोद द. तुपे)**
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रति,**

१) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर

२) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र - १, मुंबई / महाराष्ट्र - २, नागपूर
३) निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई.
४) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५) कोषागार अधिकारी, नागपूर
६) संचालक वस्त्रोद्योग, वस्त्रोद्योग संचालनालय, महाराष्ट्र राज्य, नागपूर
७) महाराष्ट्र राज्य हातमाग महामंडळ मर्या., नागपूर
८) महाराष्ट्र राज्य हातमाग सहकारी महासंघ मर्या. (महाटेक्स), मुंबई
९) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
१०) कार्यासन १६-स / १७-स, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई
११) कार्यासन अधिकारी, रोख शाखा, सहकार, पणन व वस्त्रोद्योग विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२) निवड नस्ती, टेक्स-३ कार्यासन